# जगातला सगळ्यात साहसी कुत्रा

## बाल्टोची खरी कहाणी




नताली स्टँडीफ़ोर्ड

चित्र: डोनाल्ड कुक

मराठी: अश्विनी बर्वे

# जगातला सर्वात साहसी कुत्रा

## बाल्टोची खरी कहाणी

नताली स्टैंडीफ़ोर्ड

चित्र: डोनाल्ड कुक

मराठी: अश्विनी बर्वे







ही एक खूप शूर कुत्र्याची खरी कहाणी आहे. त्याचे नाव बाल्टो होते.

१९२५ साल होते.

बाल्टो नोम, अलास्कामध्ये राहत होता.

नोम एक सीमावर्ती शहर होते.

वर्षाभरातला अनेक काळ ते बर्फाच्या खाली दबलेले राहत होते.

हिवाळ्यात एवढा बर्फ असे की प्रवास

करायला रस्ता च राहत नसे.

न विमानाने, न ट्रेनने,

न बोटीने आणि न कारने .

अलास्कामध्ये प्रवास करण्याचे एकमात्र

साधनम्हणजे कुत्र्याकडून खेचणारी स्लेज होती.





बाल्टो एक स्लेज कुत्रा होता.

तो नोम पासून थोडेसे दूर एक सोन्याच्या
खाणीत काम करत असे.

तो खोदकाम करण्याऱ्या लोकांपर्यंत खाणे,
अवजारे, पोहचवण्यासाठी मदत करत असे.

एका स्लेज कुत्र्यासाठी ते एक चांगले
आयुष्य होते.





बाल्टोच्या ड्रायव्हरचे नाव गुन्नार होते.

गुन्नारने बाल्टोला आपला मुख्य कुत्रा केले.

मुख्य कुत्रा टीमच्या पुढे धावतो.

पायवाटेवर चालतो.

सगळे इतर कुत्रे मुख्य रस्त्याच्या मागेमागे धावतात.

म्हणून मुख्य कुत्रा सगळ्यात बुद्धिमान आणि सगळ्यात ताकदवान कुत्रा असला पाहिजे.



हिवाळ्यात एक दिवस नोम मध्ये

एक भयानक घटना घडली.

दोन मुलं आजारी पडली.



मुलांच्या आईवडिलांनी डॉक्टरला बोलावले.

ते पूर्ण शहरात एकमेव डॉक्टर होते.

जेव्हा डॉक्टरांनी मुलांना बघितलं तेव्हा ते काळजीत पडले.

मुलं एका खूप भयानक डिप्थीरिया रोगाने आजारी होते.

डॉक्टरजवळ त्या आजारावरचे औषध नव्हते.

औषधाशिवाय मुलं मरून गेली असती.

औषधाशिवाय नोममधील कोणीही मरु शकते.

डॉक्टरांना माहीत होते की रुग्णांनी लवकर औषध घेणे गरजेचे आहे.







अलास्काच्या एंकोरेज दवाखान्यात
ते औषध उपलब्ध होते.

पण  एंकोरेज ८०० मैल दूर होते.

एंकोरेजच्या डॉक्टरांनी औषध
ट्रेनमध्ये ठेवून दिले.

पण लवकरच ट्रेन बर्फात फसली.

नोम पासून ट्रेन अजूनही ७०० मैल दूर होती.

नोमच्या लोकांनी एक मीटिंग घेतली.

प्रत्येकजण खूप घाबरलेला होता.

“आता आपण काय करायचं?” डॉक्टरांनी विचारेल.

रुग्णांना औषध दिलेच पाहिजे.

शेवटी कोणीतरी म्हणाले,

“कुत्र्यांच्या स्लेज गाडी हे करू शकते.

कुत्र्यांची एक टीम थकते तेव्हा दुसरी टीम काम करते.

यामुळे लोकांमध्ये उत्साह आला.

लोकांना औषध आणण्यासाठी हा उपाय सगळ्यात वेगवान वाटला.

पण डॉक्टरांना तरीही चिंता वाटत होती.

“अशाप्रकारे औषध आणायला पंधरा दिवस लागतील.

हे खूप जास्त दिवस आहेत. खूप जास्त.”





कदाचित डॉक्टर बरोबर होते.

पण दूसरा कोणताही पर्याय नव्हता. म्हणून मेयरने रेडिओवर संदेश पाठवला.

"कृपया मदत करा!" ते म्हणाले.

“आपल्याला आपले शहर वाचवण्यासाठी सगळ्यात चांगले ड्रायव्हर आणि कुत्र्यांची गरज आहे.”



गुन्नारने मेयरचा संदेश रेडिओवर ऐकलं.

गुन्नारला माहीत होते की त्याच्याकडे सगळ्यात चांगली कुत्र्यांची टीम आहे.

आणि सगळ्यात चांगला कुत्र्यांचा नेता पण त्याच्याकडे आहे. बाल्टो, मुलांना वाचवण्यासाठी येईल.

ALASKA

अलास्का

नोम
NOME
SAFETY
BLUFF
GOLOVIN
SHAKTOOLIK
KALTAG
KOYUKUK
RUBY
TOLOVANA
NENANA
एंकोरेज
ANCHORAGE

२७ जानेवारी १९२५ ला नोमची धाव सुरू झाली.

राखीव असे २१ कुत्र्यांची टीम होती.

प्रत्येक टीम वेगवेगळ्या थांब्यावर वाट बघत होती.






0 100 200 300
MILES

पहिल्या ड्रायव्हरने ट्रेनमधून औषध घेतले.

त्याने ते औषध थंडीपासून वाचवण्यासाठी फरमध्ये गुंडाळले.

मग त्याने आपल्या कुत्र्यांना लवकर हाकलले आणि दुसऱ्या थांब्यावर पोहचवले.

त्याने पुरेशा वेळात तो प्रवास पूर्ण केला.






पण लवकरच वेगाने वारे वाहू लागले.

हवा अजून थंड होत गेली.

मग बर्फाचे वादळ आले.

ते आजपर्यंतचे सगळ्यात भयानक वादळ होते.

तरीही ते धावत होते.

कोणत्याही प्रकारे ते पुढच्या पाडावावर पोहचले.

एक टीममधले दोन कुत्रे थंडीने मेले.

मग ड्रायव्हरने स्वतःला स्लेजला जुंपले.

त्याने आपल्या इतर कुत्र्यांना वादळातून बाहेर यायला मदत केली.

गुन्नार आणि बाल्टो

ब्लफ़मध्ये आपल्या पडावावर वाट बघत थांबले होते.
ते ब्लफ़ ते पॉइंट सेफ्टीपर्यन्त ३१ मैल धावणार
होते.

हे ठिकाण शेवटच्या थांब्याच्या आधीचा पडाव होता.

पण वेगाने वाहणाऱ्या वादळामुळे सगळं काही हळूहळू
करावं लागत होतं

गुन्नारने दोन दिवस वाट बघितली.

तो झोपू शकला नाही.

तो औषध येताच निघायला तयार होता.





शेवटी गुन्नारने कुत्र्यांच्या भुंकण्याचा आवाज ऐकला.

औषध आले! त्याने औषध एक छोटा स्टोव्ह आणि थोडेसे भोजन स्लेज वर ठेवले.

मग त्याने आपल्या कुत्र्यांना बांधले.

बाल्टो अभिमानाने पुढे उभा होता.

गुन्नारने आपल्या चाबकाचा आवाज केला.

“हे! तो ओरडला.

हे चा अर्थ होता “चला.”

टीम बर्फातून रात्री धावली.

सुरुवातीला टीमचे सर्व काही चांगले चालले.

पण लवकरच बर्फाच्या ढीगाने त्यांना अडवले.

कुत्रे बर्फात मानेपर्यंत अडकले. काहीजण घाबरले.

पण बाल्टो नाही.

तो शांत राहिला.

त्यामुळे दुसऱ्या कुत्र्यांना मदत झाली.

मग गुन्नारने त्यांना बर्फातून बाहेर काढले आणि परत टीम आपल्या रस्त्यावर पळू लागली.



मग टीमने एका गोठलेली नदी पार केली.

कुत्रे आणि स्लेज बर्फावर जोराने घसरले.

ज्यामुळे स्लेज पुढे निघून गेली.

गुन्नारने तिला वर उचलले.

पण औषध कुठेतरी खाली पडले.





गुन्नारने सगळीकडे औषधाचा खूप शोध घेतला.

पण खूप बर्फ पडल्याने काही दिसत नव्हते.

पण शेवटी त्याला औषधांचे पाकीट सापडले.

पण शेवटी त्याला औषधांचे पाकीट सापडले.

त्याने ते परत स्लेज वरठेवले.

टीम नदीच्या या बाजूला धावत होती.
पण अचानक बाल्टो थांबला.

“मश, (चल) बाल्टो!” गुन्नार ओरडला.

पण बाल्टो बिलकुल हलला नाही.

मग गुन्नारला समजले की बाल्टोने
असे का केले.

तिथे बर्फ तुटलेला होता.

जर टीम नदीत पडली असती तर
सगळेजण बुडले असते.

बाल्टोने प्रसंग बघून गाडी थांबवली.

“चतुर बाल्टो!” गुन्नार त्याला म्हणाला.

तेव्हा त्याने पहिले की बाल्टोचे पाय ओले आहेत.

जर ते गोठले तर बाल्टो परत चालू शकला नसता. गुन्नारने घाईने बाल्टोला अलग केला.

तो कुत्र्यांना बर्फाच्या तुकड्याजवळ घेऊन गेला.

तिथे गुन्नारने बाल्टोचे पंजे रगडले.

लवकरच ते वाळले. बाल्टो परत एकदा पळायला तयार झाला होता.





बाल्टोने टीमला भेग पडलेल्या बर्फाच्या चारी बाजूला घुमवले.

शेवटी ते परत पक्का जमिनीवर येऊन पोहचले.

ते अजूनही पायवाटेवर होते का? गुन्नारला काही माहीत नव्हते.

बर्फ एवढा जोरात पडत होता की गुन्नार आपले हात सुद्धा बघू शकत नव्हता.



पण बाल्टो त्या वाटेवरून अनेक वेळा धावला होता.

आता सगळेकही त्याच्यावर अवलंबून होते.

शेवटी वादळ थांबले.

गुन्नारला पॉइंट सेफ्टी दिसले.

“आपल्या बाल्टोने करून दाखवले!"

गुन्नार आता शेकोटीजवळ जाऊन आपले हात गरम करण्याचा विचार करत होता.

पण पॉइंट सेफ्टीवरचे सगळे दिवे बंद होते.

पुढचा ड्रायव्हर गायब होता का?

गुन्नारला काही माहीत नव्हते.

आणि माहिती काढण्याइतका वेळ नव्हता. म्हणून गुन्नार आणि बाल्टो रथांबले नाही.

ते कधी एवढे थकले नव्हते पण तरीही ते रात्रभर नोमच्या दिशेने धावत राहिले.



आता पहाट होण्यापूर्वीचा काळ होता.

आकाश चमकू लागले होते.

नोम शहरात सगळेजण झोपले होते.

गुन्नार आणि त्याची टीम शहरात पोहचली.
त्यांनी आपले काम पूर्ण केले होते.

बाल्टो खूप थकला होता की तो भुंकू सुद्धा
शकत नव्हता.

ते सतत २० तास रस्त्यावर होते.

त्यांनी ५३ मैल अंतर कापले होते.





गुन्नार औषध घेऊन डॉक्टरकडे गेला.

डॉक्टरांना आश्चर्य वाटले.

त्यांना वाटत होते की औषध यायला १५ दिवस लागतील. पण गुन्नारने औषध साडेपाच दिवसांत पोहचवले.

"धन्यवाद, गुन्नार!" डॉक्टर म्हणाले.

“तू हिरो आहेस!”

“नाही, याचा बाल्टो आहे,” गुन्नार म्हणाला.

“मी त्याच्याशिवाय हे करू शकलो नसतो.”

डॉक्टरांनी त्वरित आपले काम सुरू केले.

त्यांनी सगळ्या आजारी लोकांना औषध दिले.

काही दिवसांत ते बरे झाले.

नोम शहर वाचले.






सर्व अमेरिकेत लोकांनी बाल्टोचा जय-जयकार केला.

त्यांनी वर्तमानपत्रात त्याच्या साहसाविषयी वाचले.

बाल्टो जगभरातला प्रसिद्ध कुत्रा  झाला होता.

एका वर्षानंतर न्यूयॉर्क शहराच्या लोकांनी बाल्टोची एक मूर्ती स्थापित केली.

ती अजूनही सेंट्रल पार्कमध्ये उभी आहे.

खूप मुले या मूर्तीजवळ खेळतात.

ते बाल्टोची आठवण काढतात.

तो आत्तापर्यंतचा सगळ्यात प्रसिद्ध कुत्रा होता.



अंत